# कागदी बगळा.



मॉली.
मराठी अनुवाद : फारूक














एका माणसाने रहदारीच्या रस्त्यावरचं एक हॉटेल विकत घेतलं. त्याला जेवण बनवायला आणि ते लोकांना वाढायला मनापासून आवडायचं. तो दिवसभर काम करत राही. तरीही तो खूप खुश होता.










पण रस्त्याजवळच एक नवीन हायवे बनला आणि लोक हॉटेलजवळ न थांबता सरळ हायवेवरून जाऊ लागले. हॉटेलातली लोकांची गर्दी कमी कमी होत गेली. एकवेळ अशी परिस्थिती आली की हॉटेलात लोकांचे येणे पूर्णपणेच बंद झाले. आता दिवसभर त्याच्यासाठी रिकाम्या प्लेट्स स्वच्छ करणं आणि टेबलावरची धूळ साफ करण्यापलीकडे कोणतंच काम उरलं नव्हतं.





एका संध्याकाळी एक अनोळखी माणूस हॉटेलात आला. त्याचे कपडे जुने आणि जीर्ण झालेले होते. पण त्याचा चेहरा कमालीचा शांत होता.

आपल्याजवळ जेवणाचे पैसे नाहीत असं सांगूनही हॉटेल मालकाने त्याला आदरपूर्वक बसवलं. उत्तम जेवण बनवून खाऊ घातलं.

जेवण होताच अनोळखी माणूस हॉटेल मालकाला म्हणाला, “मी तुमच्या जेवणाचे पैसे देऊ शकत नाही. परंतु माझ्या परीने मी तुमचे आभार मानेन.”

असं म्हणून त्याने टेबलावरचा कागदी रुमाल उचलला आणि त्यापासून एक सुंदर बगळा बनवला.
“तुम्ही फक्त टाळी वाजवायची.” अनोळखी माणूस बोलू लागला.
“आणि हा पक्षी जिवंत होऊन तुमच्यासाठी नाच करेल. हा तुमच्याजवळ आहे तोवर याचा आनंद घ्या.”
एवढं बोलून तो निघून गेला.





अनोळखी माणसाने सांगितलं अगदी तस्सच घडलं. हॉटेल मालकाने टाळी वाजवताच तो पक्षी जिवंत होई आणि जमिनीवर येऊन नृत्य करू लागे.









हा हा म्हणता ‘नाचणाऱ्या बगळ्याची’ बातमी सगळीकडे पसरली.
दूरवरून लोक बगळ्याचं नृत्य पाहण्यासाठी येऊ लागले.

आता हॉटेल मालक पुन्हा आनंदी झाला. कारण आता त्याचं हॉटेल पाहुण्यांनी गच्च भरलेलं असे.

आता तो दिवसरात्र जेवण बनवत असे आणि पाहुण्यांना खाऊ घालत असे.





असेच आठवडे निघून गेले.





आणि महिनेही.





एका संध्याकाळी पुन्हा एक माणूस हॉटेलात आला. त्याचे कपडे जुने आणि जीर्ण झालेले होते. पण त्याचा चेहरा कमालीचा शांत होता. हॉटेल मालकाने त्याला पाहताक्षणी ओळखलं आणि तो आनंदून गेला.



अनोळखी माणूस काहीच बोलला नाही. त्याने आपल्या खिशातून एक बासरी काढली आणि ती ओठांना लावून वाजवायला सुरवात केली.





बासरीचे सूर ऐकून बगळ्याने शेल्फवरून खाली उडी घेतली. आणि त्याने नाचायला सुरवात केली. एवढं सुंदर नृत्य त्याने याआधी कधीही केलं नव्हतं.





अनोळखी माणसाने बासरी वाजवाणं बंद केलं.
बासरी आपल्या खिशात ठेऊन दिली.
तो बगळ्याच्या पाठीवर स्वार झाला आणि ते दोघेही दारातून बाहेर उडून गेले.




ते हॉटेल आजही रस्त्याकडेला उभं आहे. आणि आजही अनेक पाहुणे तिथं उत्तम जेवण जेवायला आणि ‘अनोळखी माणूस आणि जादुई कागदी बगळ्याची’ कथा ऐकायला मोठ्या संख्येने येतात. परंतु त्यानंतर तो अनोळखी माणूस आणि तो नाचणारा बगळा कधीच कुणाला दिसले नाहीत.

